**PFMS प्रणालीव्दारे वितरीत करण्यात येत असलेले निधी वितरण व संनियंत्रणाची जबाबदारी निश्चित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः प्रआयो-२०१७/प्र.क्र.२३९/योजना-१०**
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
तारीख: १४ ऑगस्ट, २०१७

वाचा :-

1) **शासन परिपत्रक क्रमांकः इंआयो-२०१५/प्र.क्र.३२९/योजना-१०, दि.१७ जुलै, २०१५.**

प्रस्तावना :-

सन २०१५-१६ या वित्तीय वर्षापासून इंदिरा आवास योजनेचे अर्थसहाय लाभार्थ्यांच्या बँक / पोस्ट खात्यामध्ये PFMS (Public Financial Management System) प्रणालीव्दारे थेट अनुदान जमा करण्यात येत आहे. सन २०१६-१७ पासून प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) बरोबरच अन्य राज्य पुरस्कृत ग्रामीण घरकुल योजनांसाठी देखील सदर प्रणाली लागू करण्यात आली आहे. सदर प्रणालीव्दारे लाभार्थ्यांना घरकुलाचे अनुदान थेट लाभार्थ्यांच्या बँक/पोस्ट खात्यात जमा करण्यासाठी राज्यस्तरावर एक Debit account उघडण्यात आले असून त्याची PFMS प्रणालीवर नोंदणी करण्यात आली आहे. तसेच सदरचे Debit account आवास सॉफ्टशी संलग्न करण्यात आले आहे. सदरचा निधी लाभार्थ्यांच्या बँक/पोस्ट खात्यात थेट जमा करण्यासाठी तालुका स्तरावरील पंचायत समितीमध्ये कार्यरत असलेले सहायक लेखाधिकारी (पंचायत समिती) यांना First Signatory व गट विकास अधिकारी यांना Second Signatory म्हणून प्राधिकृत करण्यात आले आहे. Digital Signature कार्यान्वित करणे तसेच खंडित करण्याचे अधिकार "राज्य व्यवस्थापन कक्ष-इंदिरा आवास योजना" मधील सहायक संचालक (लेखा) यांना संदर्भाधीन परिपत्रकान्वये प्रदान करण्यात आले होते. PFMS प्रणालीची प्रभावी अंमलबजावणी होण्यासाठी ज्या-ज्या स्तरावर सदरची प्रणाली वापरली जाते त्या-त्या स्तरावरील अधिकाऱ्यांकडे निधी वितरण व संनियंत्रणाची जबाबदारी सोपविण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) तसेच अन्य राज्य पुरस्कृत ग्रामीण घरकुल योजनांचे अर्थसहाय PFMS प्रणालीव्दारे थेट लाभार्थ्यांच्या बँक/पोस्ट खात्यात जमा केले जाते. PFMS प्रणालीची प्रभावी अंमलबजावणी होण्यासाठी ज्या-ज्या स्तरावर सदरची प्रणाली वापरली जाते त्या-त्या स्तरावरील अधिकाऱ्यांकडे निधी वितरण व संनियंत्रणाची जबाबदारी सोपविण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे. निधी वितरण व संनियंत्रणाचे स्तर खालीलप्रमाणे-

(अ) राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण अंतर्गत संचालक, उप संचालक, सहायक संचालक (लेखा) हे State Nodal Account चे खातेधारक आहेत. त्यांच्या संयुक्त स्वाक्षरीने (Digital Signature) व्दारे वितरीत करण्यात येणाऱ्या निधीपुरती त्याची जबाबदारी असेल.

(ब) जिल्हास्तरावरील प्रशासकीय निधीच्या खात्यामधून वितरीत केलेल्या निधीसाठी व संनियंत्रणासाठी संबंधित प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा व संबंधित लेखाधिकारी जबाबदार असतील.

(क) तालुका स्तरावर सहायक लेखाधिकारी व गट विकास अधिकारी या दोघांच्या संयुक्त स्वाक्षरीने (Digital Signature) व्दारे निधी वितरण केले जाते. त्यासाठी सहायक लेखाधिकारी (पंचायत समिती) यांना First Signatory व गट विकास अधिकारी यांना Second Signatory म्हणून प्राधिकृत करण्यात आले आहे. त्यामुळे या स्तरावरील निधी वितरणाची जबाबदारी संबंधित सहायक लेखाधिकारी व संबंधित गट विकास अधिकाऱ्याची असेल.

(ड) Second Signatory म्हणून Digital Signature चा वापर करून अयोग्य False Success /False Reject identify केल्याचे निदर्शनास आल्यास त्याबाबत संबंधित गट विकास अधिकारी जबाबदार राहतील.

(इ) संपूर्ण जिल्हयात First Signatory व Second Signatory चा वापर करून करण्यात आलेल्या FTO ची १०% तपासणी लेखाधिकारी, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा व २% तपासणी करण्याची जबाबदारी प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांची राहील.

(फ) तालुका स्तरावरील गट विकास अधिकारी व जिल्हा स्तरावरील प्रकल्प संचालक,जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा हे संनियंत्रणासाठी जबाबदार राहतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०८१४१६४७५३५५२० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Madhao Kale

Digitally signed by Anil Madhao Kale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e29bfbc8f31dc2b43b5ba876864f627ec1dc888a2c6faead66c26cb1a5c2f137, cn=Anil Madhao Kale
Date: 2017.08.14 16:37:34 +05'30'

**( अनिल काळे )**
अवर सचिव, ग्राम विकास विभाग

**प्रत,**

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, सीडको भवन, बेलापूर नवी मुंबई
३) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
४) निवड नस्ती (योजना-१०).